अन्विक्षा नि प्रात्यक्षिक केंद्र (टी.सी.डी.) गारज, तालुका वैजापूर, जिल्हा औरंगाबाद येथील एकूण १३ मजूरांना सेवेत कायम करुन अनुषंगिक लाभ देणेबाबत..

**महाराष्ट्र शासन**

**कृषि व पशुसंवर्धन व दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**

**शासन निर्णय क्र. न्यायाप्र २०१९/प्र.क्र.३०/१३ अे**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड, मंत्रालय-विस्तार, मुंबई-३२

दिनांक- १८ फेब्रुवारी २०२०

<u>वाचा</u>-**१.** आयुक्त(कृषि) कार्यालयाचे पत्र क्र. कृआ/१०१९/रि.पि./१९७४/१९९५/१९८७ /१९९५/श्री. ठुबे व इतर /प्र.क्र.२/आस्था-४/२०१९/९३९, दि.२०.८.२०१९

**२.** औद्योगिक न्यायालय औरंगाबाद युएलपी नं.१४७/८८ व १९२/८८ मधील दि.२९.७.१९९४ चा न्यायनिर्णय.

**३.** मा. उच्च न्यायालय मुंबई, खंडपीठ औरंगाबाद रिट पिटीशन क्र. १९७४/९५ व १९८७/९५ मधील दि.१४.१.२०१६ चा न्यायनिर्णय

**<u>प्रस्तावना-</u>**

उपविभागीय कृषि अधिकारी, वैजापूर यांचे अधिनस्थ अन्विक्षा नि प्रात्यक्षिक केंद्र (टी.सी.डी.) गारज, तालुका वैजापूर, जिल्हा औरंगाबाद येथील एकूण १३ मजूरांनी त्यांना नोकरीत कायम करुन वेतनश्रेणीसह सर्व फायदे मिळण्यासाठी मा. औद्योगिक न्यायालय, औरंगाबाद येथे संघटनेच्या वतीने तक्रार (युएलपी) क्र. १४७/८८ व १९२/८८ दाखल केली. सदर प्रकरणात दि.२९.७.१९९४ रोजी न्यायनिर्णय होवून पुढीलप्रमाणे आदेश दिलेत.

Both the complaints stand allowed it is declared that the Respondents have commited unfair labour practice under Item-6 of Shedule-IV of M.R.T.U. & P.U.L.P. Act 1971 . The Respondents are directed to give permanency to the Complainants giving permanent appointments as per the directions contained in para. no. 12 of the judgement.

२. उपरोक्त न्यायनिर्णयावर रिव्ह्यू ॲप्लिकेशन क्र.०५/१९९५ दि. ९.३.१९९५ च्या आदेशान्वये नामंजूर करण्यात आले. त्यानंतर मा. उच्च न्यायालय, मुंबई खंडपीठ, औरंगाबाद येथे शासनाच्या वतीने रिट पिटीशन १९७४/१९९५ व रिट पिटशन १९८७/१९९५ दाखल केले. सदर रिट याचिकांमध्ये दि.१४.१.२०१६ रोजी एकत्रित न्यायनिर्णय होवून मा. औद्योगिक न्यायालय, औरंगाबाद यांचा दि.२९.७.१९९४ रोजीचा निर्णय कायम ठेवून निर्णयाची अंमलबजावणी करण्याचे आदेश दिलेत. सदर न्यायनिर्णयानुसार कार्यवाही करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

# शासन निर्णय-

औद्योगिक न्यायालय औरंगाबाद यांच्यासमोरील तक्रार (युएलपी) क्र.१४७/८८ व १९२/८८ मधील दि.२९.७.१९९४ चा आदेश व रिट पिटीशन क्र. १९७४/९५ व १९८७/९५ मध्ये दि.१४.१.२०१६रोजी मा.उच्च न्यायालय, मुंबई खंडपीठ, औरंगाबाद यांनी दिलेल्या न्यायनिर्णयानुसार खालील १३ मजूरांना त्यांच्या नावासमोर दिलेल्या दिनांकापासून ग्रेड-१ मजूर म्हणून शासन सेवेत कायम करण्यात येत आहे. तसेच त्यांना त्या दिनांकापासून अनुषंगिक सर्व लाभ मंजूर करण्यास शासन मंजूरी देण्यात येत आहे.

२. शासन सेवेत खालील १३ मजूरांना घेण्याबाबतची यादी--

| अ. क्र. | कर्मचाऱ्याचे नांव | रोजंदारी मजूर म्हणून कार्यरत असल्याचा दिनांक | रोजंदारी मजूर म्हणून कार्यरत असल्या चा कालावधी | कालेलकर करारा नुसार प्रथम श्रेणी मजूर पदी नियुक्तीस पात्र दिनांक | सेवा ज्येष्ठते नुसार पात्रते चा दिनांक | न्याय निर्णया नुसार देय रक्कम | शेरा |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १. | श्री. केशव आनंदा ठुबे | ६.१.१९७४ | १९८५-२००२ | ०१.०१.१९९३ | ०१.०७. १९९४ | १३,३४९ | |
| २. | श्री.भास्कर तानाजी जाधव | ४.७ १९७३ | १९८५-२००२ | ०१.०१.१९९३ | ०१.०१. १९९५ | २१,२०१ | |
| ३ | श्री. विश्वनाथ दशरथ ठुबे | ४.७.१९७३ | १९८५-२००२ | ०१.०१.१९९३ | ०१.०७. १९९९ | १,०६,५२० | |
| ४. | श्री. सूर्यभान रंगनाथ सरोवर | १.९.१९७४ | १९८५-२००२ | ०१.०१.१९९३ | ०१.०७. १९९९ | १,०६,९०२ | |
| ५. | श्रीमती हौसाबाई वामन सरोवर | २९.३.१९७५ | १९८५-२००२ | ०१.०१.१९९४ | ०१.०७. १९९९ | ८५,३५५ | |
| ६ | श्रीमती मंडाबाई परशराम लोखंडे | १.७.१९७७ | १९८५-२००२ | ०१.०१.१९९४ | ०१.०७. २००४ | २,१०,०४० | |
| ७ | श्रीमती सोनाबाई फकीरा तुपे | ५ .८.१९७४ | १९८५-२००२ | ०१.०१.१९९४ | २७.०७. २००४ | १,९२,९४७ | |

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| ८ | श्रीमती मालनबाई केशवराव ठुबे | २१.११.१९७३ | १९८५-२००२ | ०१.०१.१९९४ | ०१.०१.२००५ | २,३३,७४७ | |
| ९ | श्रीमती वच्छलाबाई भास्कर जाधव | १४ .८. १९७३ | १९८५-२००२ | ०१.०१.१९९५ | ०१.०२.२००५ | २,१५,२५८ | |
| १० | श्री. वामन रंगनाथ सरोवर | २८.१. १९७५ | १९८५-२००२ | ०१.०१.१९९६ | ०१.११.२००५ | २,२५,०२३ | श्री.भास्कर तानाजी जाधव,दि.३१.१०.२००५ रोजी सेवानिवृत्त होत असून त्यांच्या रिक्त जागी घेण्यात यावे. |
| ११ | श्रीम. बबाबाई सूर्यभान सरोवर | ८.३.१९७६ | १९८५-२००२ | ०१.०१.१९९६ | ०१.०४.२००६ | २,१८,४३४ | श्री. विश्वनाथ द.ठुबे हे दि.३१.३.२००६ रोजी सेवानिवृत्त होतील, त्यांच्या जागी दि. १.४.२००६ पासून घेण्यात यावे. |
| १२ | श्रीम. सखुबाई आसाराम घोडके | २.६.१९७३ | १९८५-२००२ | ०१.०१.१९९८ | ०१.०९.२००६ | १,९९,२८१ | श्रीम.सोनाबाई तुपे या दि.३१.८.२००६ रोजी सेवानिवृत्त होतील. दि.१.९.२००६ पासून त्यांच्या जागी घेण्यात यावे. |
| १३ | श्रीम. सुमनबाई विश्वनाथ ठुबे | ३०.७. १९७३ | १९८५-२००२ | ०१.०१.१९९८ | १.१०.२००६ | १,७६,९९४ | श्री. वामन सरोवर हे दि. ३०.९.२००६ रोजी सेवानिवृत्त होतील. त्यांच्या जागी दि.१.१०.२००६ पासून नियुक्ती देण्यात यावी. |
| | | | | | एकूण | २०,०५,०५१ | |

उपरोक्त कर्मचाऱ्यांना त्यांच्या सेवा ज्येष्ठता व रिक्त पदांचा विचार करुन मा. उच्च न्यायालय, मुंबई खंडपीठ, औरंगाबाद यांनी दि.१४.१.२०१६रोजी दिलेल्या न्यायनिर्णयानुसार शासन सेवेत कायम करण्यात यावे.

३. न्यायालयीन प्रकरणांत वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ दि.१७ एप्रिल, २०१५ भाग पहिला, उप विभाग-२ अनुक्रमांक २ नियम ७ नुसार भारीत आकस्मिक खर्चास मंजूरी देण्यासाठी त्या नियमामध्ये नमूद अटीच्या अधिन राहून प्रशासनिक विभाग प्रमुख यांना पूर्ण अधिकार प्रदान करण्यात आलेला आहे. या अधिकाराचा वापर करुन सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

४. सन २०१९-२०२० च्या अर्थसंकल्पीय अनुदानातून लेखाशिर्ष- मागणी क्र.डी-७, २७०२-लहान बांधकामे, १०४ आयाकट विकास, (००)(०१) अन्विक्षा नि -प्रयोग निर्देशन (२७०२ १९३३) प्रक्षेत्र(अनिवार्य) (०२ मजूरी) या लेखाशिर्षाखाली रु.२०,०५,०५१/- (अक्षरी रुपये वीस लाख, पाच हजार, एक्कावन्न फक्त) खर्च करण्यास व सदर रक्कम कोषागारातून आहरीत व संवितरीत करण्यासाठी कृषि अधिकारी, वैजापूर, जिल्हा औरंगाबाद यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.१६/२०२०/व्यय-१, दि.२०.१.२०२० नुसार प्राप्त सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००२१८१६२४४५४००१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने .

Digitally signed by Ashok Maroti Atram
Date: 2020.02.18 16:27:04 +05'30'

**(अशोक आत्राम)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. आयुक्त (कृषि) , कृषि आयुक्तालय, पुणे
२.कृषि सहसंचालक, (आस्थापना) कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, शिवाजीनगर, पुणे
३.विभागीय सहसंचालक, औरंगाबाद विभाग, औरंगाबाद
४.महालेखापाल, महाराष्ट्र १/२ , (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा) मुंबई/नागपूर.
५. संचालक, लेखा व कोषागारे संचालनालय, मुंबई/नागपूर.
६.जिल्हा अधिक्षक, कृषि अधिकारी, औरंगाबाद
७.तालुका कृषि अधिकारी, वैजापूर, जिल्हा औरंगाबाद.
८.कक्ष अधिकारी, २ अे, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
९. निवडनस्ती १३ अे